महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत (अनिवार्य) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन).

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९१/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: ९ जुलै, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः संकिर्ण-२०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५, दि.१ एप्रिल, २०२०
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०
४) शासन निर्णय, पा.पु. व स्व.विभाग क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९१/पापु-२३, दि.३०.४.२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतन यांचे दायित्व शासनाने स्वीकारण्याचा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा होणारे ईटीपी चार्जेस व तांत्रिक शुल्क शासनाकडे जमा करण्याचा धोरणात्मक निर्णय मंत्रीमंडळाने दिनांक १६.०३.२०१७ च्या बैठकीमध्ये घेतला असून त्यानुषंगाने संदर्भाधीन दिनांक २३.०३.२०१७ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान म्हणून २२१५A०४१ या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०२०-२१ करिता रुपये १९,००,००,०००/- इतके लेखानुदान दिनांक ३०.४.२०२० च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले आहे. आता पुढील वेतन अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान म्हणून "मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षांतर्गत रुपये २८,५०,००,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी पन्नास लाख फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या नियमित आस्थापनेवरील कर्मचा-यांच्या सन २०२०-२१ मधील वेतन / भत्त्यासाठी वापरण्यात यावा. वेतन / भत्त्यांच्या यापूर्वीच्या कोणत्याही थकबाकीसाठी या निधीचा वापर करु नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

ब) सन २०२०-२१ मध्ये जून,२०२० अखेर प्राधिकरणाकडे जमा झालेले तांत्रिक शुल्क व ईटीपी चार्जेस शासनाकडे त्वरीत जमा करावेत.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रक्कम प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री.य.बा.पाटील, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री.अभय महाजन, सह सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. कोव्हीड-१९ मुळे निर्माण झालेल्या आरोग्य व आर्थिक आपत्तीवर मात करण्याच्या दृष्टीने राज्याची एकंदर आर्थिक परिस्थिती विचारात घेता, खर्चात काटकसर करणे तसेच काही खर्च पुढे ढकलणे गरजेचे आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.६२/ कोषा प्रशा-५, दिनांक १ एप्रिल, २०२० मध्ये नमूद कालावधीकरीता त्यात नमूद कार्यपद्धतीनुसार वेतन अदा करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

४. शासनाद्वारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

५. सदर रकमेच्या प्रत्यक्ष खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करताना कर्मचारीनिहाय प्रत्यक्ष वितरीत रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

६. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२०-२१ च्या मंजूर आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

७. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०९११२३२३७०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.07.09 13:26:13 +05'30'

**चेतन निकम**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण

प्रत: माहितीस्तव,

वित्त विभाग, व्यय-३/ अर्थसंकल्प-१८ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.

पापु-४ / पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई.

निवडनस्ती, पापु-२३